# अंजनयोग


लेखक

नामयोगी ह. भ. प. महालेशास्त्री

मन्त्रशास्त्रज्ञ, ज्योतिर्मार्तण्ड


मूल्य रुपये चार


श्रीगजानन बुक डेपो,

दादर, मुंबई २८.

## प्रार्थना

त्वया मन्यो सरथ मारुजन्तो
हर्षमाणा हृषितासो मरुत्वन।
तिग्मेषव आयुधा संशिशाना
उप प्र यन्तु नरो अग्निरूपा ॥

अथर्ववेद काण्ड ४, सूक्त ३१

(अर्थ– हे (वज्रसायक मन्यो) वज्रासारख्या कठोर आणि बाणासारखी हिंसा करणाऱ्या उत्साहा! (य ते) जो तुझा (अविधत् )सत्कार करतो, तो (विश्व सह ओजः आनुषक) सर्व शत्रूचा पराभव करणाऱ्या सामर्थ्याचे आणि बलाचे पोषण करतो (त्वया युजा) तुझ्या साहाय्याने आणि (सहस्कृतेन सहसा सहस्वता) तुझे बल वाढविणाऱ्या, शत्रूचा पराभव करणाऱ्या महान् सामर्थ्याने युक्त होऊन आम्ही (दास आर्य साहयाम) दास आणि आर्य-शत्रूचा पराभव करू.)

प्रकाशक : श्री आर व्ही रघुवंशी, गजानन बुक डेपो दादर, मुंबई–२८
मुद्रक : मु. ध. दाते, यशवंत मुद्रणालय, १८३५ सदाशिव पेठ, पुणे–३०

# निवेदन

ॐ नमः शिवाय मांगिशाय च —

सज्जन वाचकांस सादर श्रीराम — आज आपले हाती शास्त्रात अनुग्रथित असलेला व माझे पिता स्व. अनंतशास्त्री महाले याचेकडून अनुभविलेला व मी व माझे मानसपुत्र चि. रमेश तांबे यानी अनेकांचे अनेक कामासाठी करवून प्रचीत पाहिलेला षोडशी तंत्रातर्गत अंजनयोग हा ग्रंथ देत आहो.

या ग्रथात सूचित केलेले १६ अंजनयोग, त्यांची क्रिया-व्यवहार त्या त्या अंजनयोगात दिली आहेच. अंजनयोगाबद्दलची संपूर्ण चर्चा माझे स्नातक चि तांबे प्रस्तावनेत आपल्यापुढे मांडतीलच. प्रियोत्तम वाचकानो आपण हा ग्रंथ संपूर्ण वाचून आपल्या इच्छेला व जरूर असलेला प्रयोग करून पहा. त्यातून जगदंबा श्रीमहालक्ष्मी आपला क्षेमकरयोग पूर्ण करीलच ही श्रद्धा रामाचे अंतरात आहे. रामाचे पाच पिढ्यात श्रीदुर्गा, श्रीयंत्र उपासना असून त्याच महादुर्गेला प्रार्थना करून हा ग्रंथ श्रीत्र्यंबकराज (त्र्यंबकेश्वर क्षेत्री) येथे लिहून पूर्ण करीत आहे.

हा अंजनयोग जनता जनार्दनापुढे आणण्याचे कठीण काम आमचे सद्भक्त व प्रकाशक श्री रघुवंशी यानी स्वीकारले. श्रीरामप्रभु त्याचेही मंगल करो. परत एकवेळ आपणा सर्वांच्या आशीर्वादाची अपेक्षा करून निवेदन विरामित करतो.

आपला नम्र सेवक

" राम "

आज मुक्काम त्र्यंबकेश्वर (नासिक)

# लेखकाचे मनोगत

मी गूढ विद्येकडे वळलो हा माझ्या जीवनातील फार मोठा अपघात आहे. कराड इंजिनिअरिंगचा अभ्यास सोडावा लागल्याने जीवनात एक काळ अत्यंत नैराश्याचा आला. आप्तपरिवार, मित्रमंडळी, सहाध्यायी व नोकरीतील सहकारी यांनी असहकार केला. क्षणभर मानसिक स्वास्थ्य मिळू दिले नाही. प्रेसच्या धंद्यात फसवणूक, हजारो रुपयांचे कर्ज, मातृपितृशापांचा वर्षाव, व्यसनाचा अतिरेक झाल्याने शारीरिक हानि यांनी जीवन पोळत असतानाच दैव म्हणजे काय याचा शोध घेण्याच्या वृत्तीने प्रयत्न करू लागलो. टिटवाळ्याला गेलो. गजाननाच्या दर्शनाने माझे डोळे भरून आले. किती वेळ गाभाऱ्यात होतो कळले नाही, तंद्री लागली.

मी गणपतिउपासना सुरू केली. हळूहळू निरनिराळ्या अडचणीतून बाहेर पडलो. त्याच उपासनेतून मार्गदर्शन झाले. ज्योतिष, हस्तसामुद्रिक इत्यादि गूढविद्येवर असणारी पुस्तके खरेदी करू लागलो. अभ्यास, मनन, चिंतन याचा निदिध्यास लागला. स्वतःच्या पत्रिकेवरुन भावीकालाची रूपरेषा समजली. चिंतनाने स्वभावाचा पिंड बदलला. जीवनात पाचवर्षाच्या खडतर कालानंतर स्थिरता आली. मन खंबीर झाले. परमेश्वरी शक्ति आहे याचा अनुभव प्रत्यक्षात आला. सगुणदर्शनाचा योग आला. नोकरीत प्रतिष्ठा प्राप्त झाली. असंख्य मित्रांना मार्गदर्शन करता करता काही सिद्धान्त मनात दृढ होऊ लागले. संतसंगतीने आध्यात्मिक वाटचाल सुरू झाली. गुरुवर्य ह. भ. प. महाळेशास्त्री यांची भेट झाली. त्यांनी आपला मुलगा (स्नातक) मानून विद्याशानपत्र मोकळे केले. उपासना, अनुष्ठाने करुन घेतली. निरनिराळ्या

देवस्थानात नेऊन मति कुंठित करणारे चमत्कार दाखविले पूज्य गगनगड स्वामींचे प्रत्येक दत्तजयंतीला गगनगडावरचे दर्शन व समागम अलभ्य लाभ असतो त्यांच्या प्रेरणेचा भविष्य सांगताना अनुभव येतो. ओझरचे राणे महाराज मुंबईच्या मुक्कामात प्रोत्साहन व आशीर्वाद देऊन मार्गदर्शन करतात कणकवलीचे भालचंद्र महाराज, पावसचे स्वामी स्वरूपानंद यांचे दर्शन हे मनाला अनुभूत आनंद प्राप्त करून देते कलकत्याचे महायोगी दादाजी यांनी दिलेले महानाम हे क्रांतिकारक ठरले या सतांच्या शुभाशीर्वादाची शिदोरी पाठीशी आहे

पूज्य महालेबाबांच्या पाच पिढ्यात दुर्गागणेश उपासना व ज्योतिषशास्त्र यांचे अध्ययन असल्यामुळे त्यांनी जे जे मंत्राचे प्रयोग सांगितले ते मी लिहून ठेवले व त्यांचे प्रयोग निरनिराळ्या प्रसंगी करून सांसारिक अडचणींवर उपाययोजना केली अनुभव घेतला संकटग्रस्त जनतेसाठी व विशेषत तात्त्विक वाचनानंतर प्रयोग करणाऱ्या मेहनती व जिज्ञासूंकरिता ग्रथित केले

गूढविद्या जिज्ञासू व कर्मयोगाचा अवलंब करणारे माझे मित्र रमेश सूर्यवंशी ज्यांनी गजानन बुकडेपोचा प्रकाशन क्षेत्रात दर्जेदार पुस्तके प्रकाशित करणारी संस्था असा लौकिक व जनमत तयार केले, त्यांनी तत्परतेने सतत पाठीशी लागून या ग्रंथाच्या प्रकाशनाची संपूर्ण जबाबदारी घेऊन माझ्या ऋणानुबंधाचे रज्जू दृढ केले या ग्रंथाचे लिखाण त्र्यंबकेश्वरी पूर्ण केले त्यासाठी बाबूराव शिखरे व बंधु यांनी अत्यंत जिव्हाळ्याने उत्तम व्यवस्था ठेवली ग्रंथाचे वाचनास, मनन करण्यास टाचणे करण्यास व आमची तंद्री सांभाळणारे नृसिंहभक्त नायप्रेमी डॉ वासुदेव जो कुलकर्णी यांनी स्वतंत्र जागा व सोई सांभाळल्या मंत्राचे प्रयोग

करण्याकरिता सहकार्य देणारे गणेशनाम जपमंडळाचे सहकारी या सर्वांचा अत्यंत ऋणी आहे.

हा ग्रंथ विद्वत्ताप्रचुर व गूढगम्य भाषेत अनेक पौर्वात्य, पाश्चिमात्य ग्रंथाचा आधार देऊन लिहिला नाही. कारण सर्वसामान्य पीडित जनतेने याचे प्रयोग करावेत. अनुभव घ्यावा व ईश्वराचे सगुण दर्शन व्हावे असा आहे. त्यामुळे त्यांना समजेल, रुचेल, पटेल असा लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. जागेच्या अभावी अथवा इतर अडचणीमुळे हे प्रयोग करणे शक्य नसेल तर आमचे गणेशनाम जपमंडळ जे शनिवारी रात्री हे प्रयोग करते त्या तयार काजळाच्या डब्या आपण गजानन बुक डेपोकडे चौकशी करून मागवाव्यात. आपले लाख मोलाचे जीवन या अंजनप्रयोगानी यशस्वी करून घ्यावे अशी कळकळीची विनंती आहे. प्रयोगाविषयीच्या अडचणी कळवाव्यात, मार्गदर्शन करू.

आपला नम्र
ज्योतिषभूषण रमेश तांबे
मंत्रविशारद

---

पत्रव्यवहार : C/o डॉ. व्ही. जे. कुलकर्णी, काशीनाथ बिल्डिंग, मौलाना आझादरोड (जेकब सर्कल) मुंबई ११

भेटण्याची वेळ : रविवारी सकाळी ११ ते सायंकाळी ५ पर्यंत.
C/o दत्तात्रय इलेक्ट्रिकल कार्पोरेशन तळमजला, माहीम सर्व्हिस इन्डस्ट्रिअल एस्टेट, मोरीरोड, माहीम (पश्चिम) मुं. १६

# योग परिचय

हा ग्रंथ आध्यात्मिक मार्गात प्रगति करणाऱ्यांसाठी, संसारात राहून पारमार्थिक उन्नति करण्याकरिता धडपडणाऱ्या बहुसंख्य जीवांसाठी आहे. आध्यात्मिक मार्गात वाटचाल करीत असताना सांसारिक जीव मार्गदर्शनासाठी आपल्या अनेक प्रापंचिक अडचणी घेऊन येतो. त्याला आपल्या मार्गाव्यतिरिक्त काही मार्गदर्शन व्हावे या हेतूपूर्तीसाठी हा प्रपंच आहे

सध्यासमयी गृहिणी आपल्या लहानग्या बाळाला आंघोळ घालते आधुनिक राहणीपद्धतीने बेबी पावडर लावते. या क्रिया होत असताना बाळ रडतच असते व त्याला झोपविण्याचा प्रयत्न आई करीत असते. त्यावेळी घरातील वृद्ध स्त्री म्हणते, 'सूनबाई बाळाला तीट लाव म्हणजे तो रडायचा थांबून झोपी जाईल. या 'तीट लाव शब्दामागे 'काजळ देखील भर' असा अध्याहृत अर्थ असतो. घरी सुईण असेल तर बाळावर हा सोपस्कार करते. आधुनिक युगात सुईण ठेवणे या प्रकारचा लोप होत आहे. पूर्वी घरात काजळ पाडीत असत. यालाच अंजन म्हणतात.

अंजनाबद्दलची सर्वसामान्य समज कशी आहे ?

'एखाद्या विशिष्ट वस्तूपासून विशिष्ट क्रियेने तयार केलेले अंगठ्याचे नखावर अथवा काचेवर लावून, त्यात बारा वर्षाखालील अथवा पायाळू जन्माला आलेल्याला जे दिसेल त्याला उद्देशून विचारलेल्या प्रश्नाची अगम्य पद्धतीने मिळालेली उत्तरे ते 'अंजन' असा आहे. असे अंजन अघोरी अथवा पैशाचिक विद्येचे लोकच उपयोगात आणतात.

तंत्र ग्रंथात, । लक्ष्मी च धनदा नित्या अंजनेन समावृता ॥

(अर्थ–नित्य लक्ष्मी हातात रहावी म्हणून अंजनयोगाने तिला वश करावी.)

हे वाचनात आल्यावर त्या दृष्टीने अधिक माहिती व शोध घेण्याचे जिज्ञासेमुळे, असे अंजनाचे प्रयोग बंगलोर, बेळगांव, मद्रास यांकडे केले जातात असे आढळून आले. प्रथमतः असे अंजनाचे प्रयोग उपासकांचा गट तयार करून केले व ते अपेक्षेपेक्षा यशस्वी ठरले. इतकेच नव्हे तर ज्यांची श्रद्धा नव्हती अशा अनेक व्यक्तींचे जीवन बदलून गेले.

आपण अंजन म्हणजे काय ते पाहू. भारतीय संस्कृतिकोषात याचा अर्थ पुढीलप्रमाणे आहे. "अंजनाला काजळ म्हणतात. काजळ डोळ्यांत घालण्याची पद्धत भारतात प्राचीन कालापासून आहे. सुश्रुत संहितेत काजळ बनविण्याचा विधि सांगितला आहे. अजंठा लेण्यातील स्त्रियांचे डोळे मोठे व बदामी आकाराचे दाखविले आहेत. काजळाला भुते–खेते भितात अशी समजूत आहे. मुंजीत बटूला व लग्नात नवरा–नवरीला काजळ घालून त्याचे गालबोट लावतात. नेत्ररोग होऊ नये म्हणून काजळ भरतात. रसिक श्रेष्ठांनो, सुभाषितात काजळाचे महत्त्व पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे.

अधरे नववीटिकानुरागो नयने कज्जलमुज्जलं दुकूलम्
इदमाभरणं नितम्बिनीनामितरद्भूषणमङ्गदूषणाय ।

(अर्थ–अधरावर तांबुलाचा रक्तिमा, डोळ्यात काजळ व झुळझुळीत तलम वस्त्र, हेच खरे रमणीचे अलंकार मंडन होय. इतर भूषणे ही त्यांच्या अंगावरची दूषणे ठरतील.)

पुरातन काळी लग्नाच्या वेळी वधूवराच्या डोळ्यात काजळ घालीत लग्नाच्या चवथ्या दिवशी वधूवर परस्पराच्या डोळ्यात अजन घालीत व त्या वेळी आपले डोळे मघासारखे तेजस्वी होवोत अशी मत्रयुक्त प्रार्थना करीत असत "

, आपण काजळ डोळ्यात घालतो त्या वेळी डोळ्याच्या बुब्बुळा-भोवती जे पाढरे आवरण असते त्यात सूक्ष्म मज्जातन्तूचे जाळे असते याचा सबध मेंदूतील दृष्टिकेंद्राशी असतो काजळामुळे या मज्जातन्तूना आलेला थकवा, ताण नाहीसा होऊन ते उत्तेजित होतात व मज्जातत् ारे मेंदूला आलेले दौर्बल्य कमी करतात. यामुळे मनाचे जे 'सुप्तमन' असते त्याच्या कार्याला चालना मिळून अनेक कामे यशस्वी होतात

## सुप्त मनाचे अगाध सामर्थ्य

व्यवहारात आपण कधी कधी म्हणतो किंवा ऐकतो की, अमक्या अमक्या मनुष्याचे मन ताब्यात आहे माझे मन माझ्या ताब्यात नाही मन ताब्यात असणे म्हणजे नक्की काय ? सर्वसाधारणपणे ज्या माणसाचे विचार एकाच गोष्टीवर केंद्रीभूत होत नाहीत, त्याला 'चचलमन' असे म्हणतात ज्याचे विचार कोणत्याही गोष्टीवर केंद्रीभूत होतात त्याचे नाव 'स्थिर मन' या स्थिर मनाचा आविष्कार म्हणजेच मनुष्याचे मन ताब्यात असणे हे होय

या सुप्त मनाचे कार्य कसे चालते हे पाहणे मनोरजक आहे

१) ज्या कल्पना तुम्ही करता त्या कल्पनाचे रूपातर उत्कट इच्छेमध्ये झाल्यानतर ती उत्कट इच्छा प्रत्यक्ष सत्य रूपात उतरवून दाखविणे.

२) तुम्ही जी कल्पना, इच्छा अथवा योजना या सुप्तमनाकडे सोपवाल ते ती खरी करून दाखविते व सत्यस्वरूपांत उतरविते.

३) आपण परमेश्वराला प्रार्थना करतो, उदाहरणार्थ पूजा, स्तोत्रपठण, मंत्रोपासना. त्या प्रार्थनेचे उत्तर आणण्याचे काम सुप्त-मन करीत असते.

४) सुप्तमनाचे कार्य अहोरात्र अखंड चालू असते.

मानसशास्त्रज्ञांनी मनाचे जागृत मन व सुप्त मन असे मनाचे दोन विभाग पाडले आहेत. जागृत मन हे अहोरात्र विशिष्ट काळातच पंचेंद्रियांच्या साह्याने कार्य करीत असते. सुप्त मन मात्र आपले कार्य नकळत करीत असते.

तुमच्या मनात चांगल्या विचारांची आंदोलने जेवढी जास्त प्रमाणात असतील तेवढे ते तुमचे सुप्तमन जास्त चांगल्या प्रकारच्या गोष्टी तुमच्या आयुष्यात घडवून आणते. परंतु निर-निराळ्या मानसिक धक्क्यांनी जर मनात वाईट विचारांची निर्मिति होत राहील तर त्यामानाने सुप्त मन हे दैनंदिन जीवनात *अनेक अडचणी, संकटे उभी करते. यासाठी तुम्ही सद्‌विचारच* मनात आणावेत हे उत्तम होय. उपासना करावी म्हणजे मन हे सद्‌विचारांनी ओतप्रोत भरून राहील व अमंगळ विचारांचा एखादा तरंगदेखील मनःसागरावर उठणार नाही. अंजनप्रयोगाने आपणांस ह्या सुप्त मनाला प्रगतीकारक मार्गानेच न्यावे असे वळण लागते.

## श्रद्धेची किमया

एखाद्या विचाराचा आपल्या मनावर सारखा परिणाम होत गेला तर अखेरीस त्या विचाराचा परिणाम प्रत्यक्ष आपणांस त्या

विचाराशी एकरूप बनवितो. ह्या एकरूप विचाराला भावनेची जोड असेल तर त्यातूनच श्रद्धा निर्माण होते. स्तोत्रपठण, मंत्र जपणे, पूजाअर्चा या भावनेने केल्यास त्यातून 'एक अज्ञात, अगम्य शक्ति' आपल्या पाठीशी असून ती आपले जीवनाचे नियंत्रण करीत आहे हा विचार प्रबळ करते अशा रीतीने श्रद्धा निर्माण होते. याच प्रबळ विचाराच्या संबंधी चर्चा, माहिती करून घेत असता श्रद्धा सामर्थ्यवान होत जाते म्हणून आपल्या प्रयत्नांना विरोध करणाऱ्या अश्रद्ध मनुष्याशी चर्चा करू नये. त्याच्या चर्चेचा मुख्य रोख तुम्हाला चांगल्या विचारापासून परावृत्त करण्याचा असतो. अशा प्रसंगी ते तार्किक विधाने, टीका यांचा सर्रास उपयोग करतात. अंजन तयार करण्याकरिता श्रद्धेची अत्यंत आवश्यकता आहे

## चिकाटी

आपल्या दैनंदिन व्यवहारी जगात पूजा, अर्चा करण्यास तास दोन तास बसण्याची सवय नसते. एकाच जागेवर बसून मंत्रजप करणाऱ्या व्यक्तीला कमीतकमी तीन ते चार तास बसणे सहज शक्य असते. अंजन तयार करताना रात्री जवळजवळ चार ते पाच तास बसणे आवश्यक असल्यामुळे तशी सवय व्हावी म्हणून रोज कमीतकमी अर्धातास मांडी घालून बसून जप करावा

## एकाग्रता

एकाच गोष्टीवर आपले मन स्थिर करणे यास एकाग्रता म्हणतात. अंजनयोगात एकाग्रतेला फार महत्त्व आहे ज्या मंत्राने अंजन तयार करावयाचे असेल त्या मंत्राचा रोज काही ठराविक वेळात जप करून स्पष्ट स्वरउच्चार करण्यास शिकावे. मंत्र

मोठ्याने उच्चारावे त्यायोगे शब्दलहरींच्या शक्तीने अंजन प्रभावी होते. अंजन प्रयोग करीत असताना डोळे मिटून त्या मंत्राशी एकरूप होण्याचा प्रयत्न करावा. तल्लीन होऊन जप करावा. त्यामुळे मनावरचे फार मोठे दडपण कमी होते असा अनुभव आहे.

## इष्टदेवता मूर्ति

अंजनात पूजेकरिता ठेवण्याची मूर्ति अथवा तसवीर ही कोणत्याही जागृत देवळातील त्या देवतेच्या मूर्तीस स्पर्श करून आणावी. देवळातील मूर्तीभोवती उच्च अदृश्य चुंबकीय प्रवाह असतात. त्यामुळे आपण स्पर्श करून आणलेल्या मूर्तीला अथवा तसविरीला चुंबकत्व प्राप्त होऊन घरात पूजेत मन एकाग्र होते. देवळात येणाऱ्या प्रत्येक भक्ताच्या श्वासोच्छ्वासातून मूर्तीभोवती हे चुंबकीय क्षेत्र तयार होत असते. मंदिरात गेल्यावर मनाला जी प्रसन्नता वाटते त्याचे मूलभूत कारण हेच आहे.

अंजन प्रयोगात करावयाची रचना




दिशा — पूर्व अथवा पश्चिम.

**वस्तु** – चौरंग, चौरंगावर स्वच्छ कोरा कपडा, तांब्याचा कलश, २ नारळ, ५ देठाची पाने, ५ अख्ख्या सुपाऱ्या, आंब्याचा टाळा अथवा ५ देठाची पाने. अबीर, कुंकू, अष्टगंध, हळद, पिंजर, चंदन, केशर, देवतेची मूर्ति अथवा तसबीर, ५ प्रकारची फळे नसल्यास ५ केळी किंवा एखादे फळ. ५ मुठी तांदूळ, उदबत्त्या, धूप, कापूर, १। रु. दक्षिणा, फुले, हार.

काजळासाठी १ ताट, ताटाला आधारासाठी सारख्या उंचीचे ग्लास अथवा लाकडी ठोकळे एरंडेल तेल अथवा शुद्ध तूप, वाटी अथवा सोलगट भांडे, कापसाच्या ५ ते ७ वाती व त्या उभ्या रहाण्यात या साठी बोल्ट किंवा स्टँड नसल्यास जुन्या भोक असणाऱ्या पैशाचा उपयोग करावा.

**रचना** – प्रथम पूर्व दिशेला अथवा पश्चिम दिशेला शेणाने सारवून त्या जागेवर चौरंग मांडावा. चौरंगावर कोरे कापड घालावे त्यावर मागे भिंतीला टेकून आपल्या उपास्य देवतेची तसबीर ठेवावी. चौरंगाच्या मध्यभागी कापडावर ५ मुठी तांदूळ घेऊन त्यावर तांब्याचा कलश ठेवावा. कलशात पाणी घालून वर आंब्याचा टाळा ठेऊन त्यावर नारळ ठेवावा. तांब्यासमोर ५ पाने देठाची पुढे करून ओळीत ठेवावीत. त्यावर ५ सुपाऱ्या पुढून ठेवाव्यात चौरंगावर कलशाच्या उजव्या बाजूस एका देठाच्या पानावर १। रु. दक्षिणा ठेवावी. दुसऱ्या डाव्या बाजूस फळे ठेवावीत.

चौरंगासमोर जमिनीवर सुंदर रांगोळी काढावी. त्यावर वाटीत एरंडेल तेल अथवा तूप घेऊन त्या वाटीत ५ वाती ठेवाव्यात (पेटवू नयेत.) नंतर ३ समान उंचीचे ग्लास अथवा ठोकळे घेऊन त्यावर ताट ठेवावे. ताटात अर्धा ते पाऊण उंचीपर्यंत पाणी ओतून

ठेवावे. ताटाखालील वातीची ज्योत व ताटाचा तळभाग यात थोडे अंतर असावे. कारण काजळ तयार होताना वाती विझू नयेत.

अंजन ज्या वेळी सुरू करावयाचे असेल त्या वेळेच्या अगोदर पूजेच्या साहित्याने पूजा करून घ्यावी. चंदनात, अष्टगंधात केशर टाकावे. कलशाला, नारळाला, सुपाऱ्यांना आपल्या इष्टदेवतेच्या तसविरीला हळद, कुंकू वगैरे लावून पूजा करावी. फुले, हार कलशाला, तसविरीला सुपाऱ्यांना वाहावीत. काजळासाठी बसणाऱ्या सर्व व्यक्तींनी पूजा आटोपून घ्यावी. जपाच्या ठरलेल्या वेळी कापसाच्या वाती पेटवाव्यात व जपाला सुरवात करावी. सर्व अंजनप्रयोगात करावयाची रचना सर्वसाधारणपणे वरील प्रमाणेच आहे.

जप रात्री संपविताना आरती म्हणून जप संपवावेत. सकाळपर्यंत पूजा तशीच ठेवावी. सकाळी ताटाच्या तळभागावर जमलेल्या काजळाची आकृति पहावी. वास्तूदोष असेल तर त्या घरातील वायुरूप अतृप्त आत्म्याचे चेहरे स्पष्ट आलेले असतात. काजळ सुरीने अथवा कोणत्याही साधनाने गोळा करावे व ते एका वाटीत घेऊन त्यात काळधागाईचे अथवा शुद्ध तूप घेऊन रात्री जप केलेला मंत्र म्हणत करंगळीच्या जवळच्या बोटाने खलून काजळ करावे. त्या काजळाच्या डब्या भराव्यात. हे काजळ फक्त घरातील अथवा जपातील व्यक्तींनीच वापरावे इतरांसाठी बाजारात मिळणारे काजळ द्यावे.

कलशातील पाणी घरात शिंपडावे. सर्व व्यक्तींनी ते पाणी थोडे थोडे प्यावे. उरलेले पाणी बाटलीत भरून ठेवावे. शारीरिक व्याधीकरिता याचा उपयोग पुढे करावा. पाच सुपाऱ्या धान्याचे डबे, पूजेचा देव्हारा, पैसे ठेवण्याची जागा यात ठेवाव्यात. एखादी

सुपारी भगव्या रंगाच्या कपड्यात घालून ती दरवाज्यावर बांधावी. फळांचा प्रसाद करावा व तो सर्वांना वाटावा. नारळ पाने, दक्षिणा, कपडा, तांदूळ जवळच्या देवळात नेऊन द्यावेत पुजारी ते घेईल अथवा कोणत्याही गरिबास देऊन टाकावे व नमस्कार करावा.

येथपर्यंत अंजनयोगाविषयी सांगोपांग माहिती दिल्यावर पुढील भाग हा अंजनप्रयोगाचा असल्यामुळे त्यातील प्रत्येक प्रयोग नीट वाचून जो अजनप्रयोग आपणास करावयाचा असेल तो समजेपर्यंत वाचून नतर प्रयोग करावा. आपणास या प्रयोगाने मिळणारी चित्तशांति ही कल्पनातीत रम्य असेल. चला तर आपण पुढील भागात अंजनाचे प्रयोग अभ्यासू या.

---

" अंजनयोगात लागणारी स्तोत्रे विकत घेऊन त्याच्या प्रती जपास बसणाऱ्या व्यक्तींना द्याव्यात

१) गायत्री अंजनयोग – मंत्र " ॐ भूर्भुवः स्वः ॐतत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि धियो यो नः प्रचोदयात्
२) लक्ष्मी अंजनयोग – दुर्गाकवच
३) मारुति अंजनयोग – मारुतिस्तोत्र (भीमरूपीस्तोत्र)
४) विष्णु अंजनयोग – श्रीविष्णुसहस्रनाम
५) सूर्यांजनयोग – वशिष्ठकृत सूर्यस्तोत्र
६) श्रीवरदा अंजनयोग–लक्ष्मीस्तोत्र
७) वडवानल अंजनयोग – हनुमानचालीसा मोठे पुस्तक किंमत २० न. पैसे

वा. ल. पाठक प्रकाशन यांतील ३ रे हनुमान स्तोत्र हेच वडवानल स्तोत्र

८) सर्वसिद्धि अंजनयोग – श्रीसिद्धलक्ष्मीस्तोत्र ( दुर्गागणेश उपासना व शंकरसंहिता या आमच्या प्रकाशनामध्ये मिळेल.)

९) व्यंकटेश अंजनयोग – श्रीव्यंकटेशस्तोत्र

१०) नवनाथ अंजनयोग – श्रीनवनाथ भक्तिसार किंमत १० रुपये

११) शिवाजनयोग – मंत्र ॐ नमः शिवाय ॐ

१२ कुंजिका अंजनयोग – अथ कुंजिकास्तोत्र (निर्णयसागर प्रकाशन)

१३) नारायण अंजनयोग – मंत्र ॐ नमो नारायणाय ॐ

१४) दुर्गागणेश अंजनयोग – श्रीसूक्त व गणपति अथर्वशीर्ष (संस्कृत)

१५) राधिका अंजनयोग — श्रीकालभैरव स्तोत्र

१६) नवग्रह अंजनयोग – नवग्रह स्तोत्र

## अनुक्रमणिका

### बुद्धीची धारणा व आत्मसामर्थ्य वृद्धीसाठी

# गायत्री अंजनयोग

गायत्री मंत्र हिंदुधर्माचा प्राचीन व महान् शक्तिदायक मंत्र आहे रवीन्द्रनाथ टागोर यानी त्यास भारताचा बोधकारक मंत्र असे म्हटले आहे मंत्र निरनिराळ्या प्रकारचे असतात. काही, मंत्र बीजाक्षररूप असतात उदाहरणार्थ ' ऐं ह्रीं क्लीं चामुण्डायै विच्चे ' दुसरे सरळ प्रार्थना करण्याचे असतात जसे ' ॐ नमः शिवाय ' गायत्री मंत्र बीजाक्षररूप व सरळ प्रार्थनात्मक असा दोन्ही गुणानी युक्त आहे तसे पाहिले तर प्रथम बीजाक्षर व नंतर प्रार्थना असा या दोन्हीचा लाभ एकाच वेळी या मंत्राने प्राप्त होतो

बीजाक्षराचा मुख्य उपयोग त्याच्या ध्वनीचा प्रभाव व त्याचा गूढार्थ जाणल्यामुळे होतो सरळ भाषेतील प्रार्थना गूढार्थ समजण्याच्या योग्यतेची न होऊन देखील त्यापासून ईश्वरी भावना प्रभावित होते. योग तीन आहेत. ज्ञानयोग, कर्मयोग, भक्तियोग. गायत्री मंत्रात हे तीनही योग बीजरूपाने अंतर्भूत आहेत. ॐ परमेश्वराचे प्राचीन नाव आहे. त्याच्या गुणाचे ज्ञान प्रचितीनेच होते. प्रचिती ही ईश्वराच्या गुणाची कसोटी आहे जसे भू: जीवन देणारे तत्त्व, 'भुव:' रक्षण करणारे किंवा दु:ख निवारण करणारे आणि स्व: संपत्ति आणि ऐश्वर्य इत्यादि देणारे तत्त्व. भू: अर्थात् ईश्वरच आम्हाला जीवन देतो जोपर्यंत ईश्वराची कृपा आमच्यावर आहे, तोपर्यंत आमचे कोणत्याही प्रकारे अनिष्ट होऊ शकत नाही, 'भुवः' अर्थात् ईश्वरच आमचे रक्षण करतो जोपर्यंत

देवाची कृपा राहील तोपर्यंत कोणीच आमचे कोणत्याही प्रकारे नुकसान करू शकत नाही. 'स्वः' म्हणजे ईश्वरच सुख आणि संपत्ति देतो. त्याच्या कृपेमुळे आम्हांला कसलीही उणीव भासणार नाही. यासाठी परमेश्वरावर दृढ विश्वास ठेवून शक्तिशाली बना. हा गायत्री मंत्राचा आदेश आहे.

यावरून स्पष्ट होते की, मनुष्य कितीही हताश झाला तरी त्याच्यात प्राणशक्ति फुंकून शक्तिशालि, धैर्यवान आणि आत्मबल-संपन्न असा समर्थ बनविण्याची क्षमता गायत्री मंत्रात आहे. अशा प्रकारे गायत्री मंत्रामध्ये मनुष्याच्या अस्तित्वाचे अमोघ तत्त्व अंतर्भूत आहे. पूर्ण अर्थ समजून गायत्री मंत्राचा जप करणारा उपासक अत्यंत धाडसी होतो. तो केव्हाच भित्रा होऊ शकत नाही. ईश्वरावरची श्रद्धा व विश्वास ज्या वेळी उडून जातो त्या वेळी कोणताही समुदाय, जाति, वर्ग हे आधारशून्य आणि दुर्बल होऊन पराधीन होतात. उपयुक्त भावनांच्या बरोबरच मंत्रानुष्ठान केले तर आत्मशक्तीची प्राप्ति होते. केवळ मंत्राचा अर्थ समजून प्रेम आणि विश्वासपूर्वक तल्लीन होऊन जप करणाऱ्याला केव्हाच पराधीन होण्याची पाळी येत नाही आणि तो कोणत्याही धर्मांध समुदायापासून घाबरून न जाता त्यांचा सामना करू शकतो. गायत्री मंत्राचा दुसरा भाग 'तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि' आहे. आम्ही त्या वंदनीय ईश्वराच्या कल्याणकारी तेजाचे ध्यान करीत आहोत. हे एक कर्म आहे. हा एक कर्मयोगाचा उपदेश आहे. 'धियो यो नः प्रचोदयात्' ईश्वराने आमच्या बुद्धीला सन्मार्ग दाखवावा हा तिसरा आणि शेवटचा भाग स्पष्टरूपात प्रार्थना आहे. हा 'भक्तियोग' झाला. अशा प्रकारे गायत्री मंत्रात ज्ञान, कर्म आणि भक्तियोग ही अंतर्भूत आहेत.

मंत्राचा योग्य अर्थ समजून केलेला जप सर्वांत उत्तम असतो. मंत्रार्थ न समजता देखील त्याचा शुद्ध उच्चार केल्यामुळे जी ध्वनींची कंपने निर्माण होतात त्याचा अत्यंत उपयुक्त प्रभाव पडतो. जसे राग-रागिणींला सर्वथा अपरिचित असे हरणाचे कळप वीणेमधून निघणाऱ्या मधुर स्वरलहरीमुळे स्तब्ध उभे राहतात. गायत्री मंत्राचा जप चालू असताना शारीरिक प्रक्रियांचे निरीक्षण करताना असे आढळले की, कोडी रज्जूमध्ये असणाऱ्या स्थितचक्रातून चैतन्य वर चढताना चक्रात गति जाणवते, आणि वाटते जणू कमलपुष्पाच्या या पाकळ्या उमलत आहेत व बंद होत आहेत. चक्रात अशा प्रकारे होणाऱ्या क्रियांनी कुंडलिनी शक्ति हळूहळू अवश्य जागृत होईल. कदाचित् पुष्कळ वेळ लागेल खरा, परंतु गुरुशिवाय अशा यौगिक शक्तींचा विकास करण्याचा हा एकच अत्यंत सरळ, सोपा व निर्विघ्न उपाय आहे.

गायत्री संहिताच्या २५ व्या मंत्राचा मराठी अर्थ पुढे दिला आहे. त्यावरून वरील कथनाची सत्यता पटेल. गायत्री मंत्राचा अर्थ. ॐ प्रभु तुम्हीच आम्हाला जीवन देता. तुम्हीच आमचे रक्षण करता आणि सुख व संपत्ति देता. त्या तुमच्या कल्याणकारी तेजाचे आम्ही स्मरण करतो. तुम्ही आमच्या जीवनरथाचे सारथी बनून आमच्या बुद्धीला मार्ग दाखवा. हा मंत्र अंतःकरणापासून प्रार्थना करणाऱ्याचे रक्षण करून आपल्या 'गायत्री' नावाची यथार्थता सिद्ध करतो. परमात्मा तुम्हाला मार्ग दाखवितो म्हणून तुम्ही दृढ श्रद्धा व विश्वास ठेवा की, कोणीच तुमचे वाकडे करू शकत नाही. ही प्रार्थना मन, वचन व कर्म या एकतानतेत केली पाहिजे. त्याचे चिंतन, मनन याचे व्यवहारात पालन केले पाहिजे. प्रार्थना करताना त्याचा मानसिक प्रभाव काय पडतो, याचे

निरीक्षण केल्यास प्राणशक्ति (चैतन्य) सर्व चक्रांमधून निघून लंब वर्तुळाकार फिरत आहे असे वाटते. शरीरात पायाच्या वरच्या भागापासून डोक्यापर्यंत ही प्राणशक्ति गति घेत आहे असे अनुभवास येते. ती जितकी गतिमान होईल तितकी अधिक शक्ति उत्पन्न होईल. गायत्री मंत्राचा जप केल्यामुळे आपल्या शरीरात शक्ति उत्पन्न करण्याच्या क्रियेची सुरवात होते. कुंडलिनी जागृत झाल्यावर आपण जो दृढ संकल्प करू त्याचा प्रभाव इतरांवर पडतो. ज्याप्रमाणे माणसाचा स्वभाव बदलू शकतो व रोग निवारणासाठी साहाय्य करता येते, त्याप्रमाणेच यासारख्या गोष्टीसाठी ईश्वराच्या कृपेची आवश्यकता आहे. त्यासाठी प्रार्थनेचे रहस्य समजून त्याप्रमाणे आचरण ठेवले पाहिजे. प्रार्थनेत आपण ईश्वरापासून मार्गदर्शनाची इच्छा करतो, म्हणून त्याला प्रसन्न करून घेण्यासाठी आपल्यामध्ये दैवी गुणांचा विकास करणे आवश्यक आहे. दैवी आणि आसुरी प्रवृत्तीच्या गुणांचे गीतेच्या सोळाव्या अध्यायात विस्तृत विवेचन केलेले आहे. उपासकाने त्या अवश्य जाणून घेतल्या पाहिजेत. ज्याप्रमाणे कारखान्यात मोटारची शक्ति उत्पन्न होते, त्याप्रमाणेच वेगवेगळ्या चक्रांमध्ये प्राणाचे वहन होऊन आपल्या शरीरात शक्तीचे संचलन होते. ज्याप्रमाणे घड्याळातील एका चक्राच्या धक्क्याने दुसरी चक्रे फिरू लागतात आणि घड्याळातील पूर्ण यंत्रसमूह गतिशील होतो, त्याप्रमाणे गायत्री जप ज्या प्रमाणात वाढत जाईल त्या प्रमाणात प्राणशक्तीचा वाढ होऊन ती उत्तरोत्तर शक्तिशाली होत जाते. आता भूः, भुवः, स्वः याचा उच्चार केल्यावरोबर शरीरात प्राणशक्ति कोणकोणत्या भागात चैतन्यशील होते आणि त्याचे रहस्य काय यावर दृष्टिक्षेप करू या. 'भूः' जीवनतत्त्व (अग्नवलै) याचे स्थान बेंबीखाली असणाऱ्या मणिपूर चक्रात आहे. 'भूः' या उच्चार

करताना बेंबीखालच्या मणिपूर चक्रात स्पंदन झाल्याची जाणीव होते 'भुवः' चा उच्चार केल्यावर प्राणशक्ति बेंबीखाली स्थित मणिपूर चक्रामधून हृदयाजवळच्या अनाहत चक्रामध्ये प्रवेश करते. 'स्व' संपत्ति ऐश्वर्य देणारे तत्त्व (बुद्धिबळ) याचे स्थान सहस्त्रारचक्र अर्थात् मस्तकात आहे 'स्वः' चा उच्चार करतेवेळी प्राणशक्ति अनाहत चक्रामधून पुढे जाऊन सहस्त्रार चक्रात प्रवेश करते. यानंतर ॐ चा उच्चार केल्यावर सहस्त्रार चक्रातून निघून चिद् आकाशात प्रसारित होऊन पुन्हा बेंबीच्या मणिपूर चक्रात प्रवेश करून चक्राकार गति पूर्ण करते. याप्रमाणे 'तत्सवितुर्वरेण्य भर्गोदेवस्य धीमही धियो यो नः प्रचोदयात्'चा उच्चार केल्यामुळे प्रत्येक वेळी चक्राकार गति पूर्ण होईल गायत्री मंत्राच्या उच्चाराने आपली प्राणशक्ति चार प्रदक्षिणा पूर्ण करून शरीरातील सर्व यंत्रांना पूर्णपणे गतिमान करून शक्ति उत्पन्न करते. गायत्री मंत्र श्रेष्ठ आहे. 'विनाशकाले विपरीतबुद्धि' अर्थात् विनाश होण्याच्या वेळी सर्व प्रथम बुद्धीच विकृत होते. शुभ, अशुभ विचार करण्याची क्षमताच रहात नाही. म्हणून उत्कर्षाची इच्छा करणारा उपासक सद्बुद्धीपेक्षा अधिक चांगली वस्तु ती कोणती मागू शकेल. आणि हेच आपण गायत्रीमंत्राद्वारे मागत असतो गायत्री मंत्राने आपण प्रभुसान्निध्य, रोग निवारण, शारीरिक शक्ति आणि आत्मबल, तसेच संपत्ति प्राप्त होण्यासाठी बुद्धि व शक्ति ईश्वराने आपल्याला द्यावी म्हणून त्याची प्रार्थना करतो परमेश्वर आपल्या सन्मुख उभा राहून आपल्याला अंगबल, आत्मबल व ऐश्वर्य देत नाही तर ब्रह्मचर्याचे पालन करून शारीरिक शक्तिवृद्धीसाठी धैर्य देऊन दुःख दूर करण्यासाठी आणि संपत्ति प्राप्त होण्यासाठी तदनुकूल बुद्धि प्रदान करतो असे म्हटले आहे की, "न देवा दण्डमादाय रक्षन्ति पशुपालवत् । य तु रक्षितुमिच्छन्ति

बुद्धया संयोजयन्ति तम् ॥" 'देवता गवळ्यासारखी काठी घेऊन कोणाची रक्षा करीत नाही, तर ती ज्याचे रक्षण करायचे त्यांना समयोचित बुद्धि देते." जगात कोणीही व्यक्ति, समाज आणि राष्ट्र याना मानाचे स्थान मिळावे म्हणून प्रयत्न करील त्याला या तीन शक्तींची नितान्त आवश्यकता आहे. याचे ज्ञान प्रत्येक समजुतदार व्यक्तीला असले पाहिजे. जी व्यक्ति, समाज किंवा राष्ट्र याची उपेक्षा करील, त्याच्या स्वातंत्र्याला नेहमी भय राहील. इतिहास साक्ष आहे. या क्षणी या तीन शक्तींसाठी जनसमुदायाचे संगठन आवश्यक आहे.

एकदा मार्गाने जाताना राजनीतिनिपुण आचार्य चाणक्याच्या पायात गवताचे कुसळ टोचले. बस्स, आचार्य चाणक्यांनी ज्या ठिकाणी कुसळ टोचले त्या स्थानावरील संपूर्ण गवताचा उपटून नाश केला. त्यांनी असे का केले ? या प्रश्नाच्या उत्तरासाठी त्यांनी सांगितले की, रोग आणि शत्रु याचा संपूर्ण नाश करावयास हवा. भुवः आणि स्वः चे अनेक अर्थ संस्कृत भाषेत आहेत. परंतु गायत्रीमध्ये त्यांचा अर्थ अन्तरिक्ष किंवा स्वर्ग असा नाही, तर दुःख दूर करा आणि सुख मिळवा इतकाच आहे. पुढील उदाहरणावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. हिंदु जातीत जरी सर्व लोक गायत्री जप करीत नसले तरी त्यांच्या प्रार्थनेत वरील दोन्ही भावना व्यक्त होतातच. १ ) आपदामपहर्तारं .. नमामि अहम् (रामरक्षा) २) आपद् उद्धारिणी आद्या आनन्ददात्री च ... प्रणमामि अहम् (जगदबास्तुति ) या प्रार्थनांमध्ये गायत्री मंत्राचेच अनुकरण झालेले आहे. सर्व देवतांच्या स्तुतीमध्ये त्या दोन गोष्टी प्रमुख रूपाने असतात. या व्यतिरिक्त कोणत्याही देवतेची मूर्ति अथवा चित्र यामध्ये 'अभय' व 'वरद' ह्या दोन मुद्रा असतात. याचा

अर्थ असा 'देवता आमचे रक्षण करो आणि सुख देवो ।' अंतरिक्ष आणि स्वर्ग असा 'भुवः किंवा 'स्व' ' या अर्थ त्याज्य आहे. हिंदु धर्म, साहित्य आणि सम्प्रदायात गायत्री निरनिराळया रूपात व्याप्त आहे. उदाहरणाने हीच गोष्ट अधिक स्पष्ट होईल. जीवन-दाता, रक्षक, बुद्धिबल आणि सुखसंपत्तीची वृद्धि करणारा ईश्वर आहे हिंदुधर्मात ईश्वराच्या ह्या तीन विभूति मानल्या आहेत.

पहिले स्वरूप जीवनदाता, – पवनपुत्र, हनुमान आपल्यापुढे ब्रह्मचर्याच्या आदर्शातून शारीरिक शक्तीचा विकास करा असा आदेश देतो. याचबरोबर भक्ति आणि आज्ञापालक याचा आदर्श उभा करून प्रेरणा देतो. दुसरे स्वरूप चण्डी – साहस आणि शक्तीच्या साहाय्याने अनाचारी भयंकर दैत्याचा नाश करण्या-साठी आत्मबल वाढविण्याचा बोध करते. आपण देखील त्याच प्रकारे साहस, शक्ति आणि आत्मबल संचित करून दुराचार व अनाचार यावर विजय प्राप्त करावा असा संदेश या रूपात दिसतो तिसरे स्वरूप – विरक्त समर्थ आणि, भगवद्भक्त गुरूपासून ज्ञान प्राप्त करून बुद्धि व सामर्थ्य वाढवून, प्राकृतिक शक्तीचे नियंत्रण करून ऐश्वर्य प्राप्त करून घ्यावे असा संदेश देते गायत्री मंत्राचा जप यन्त्रवत न करता वरील तीन शक्तीच्या वृद्धीचा संकल्प करून समाजात आदर्श स्थापण्यात आपण पुढे असले पाहिजे. या आदश ना विसरणारा समाज पराधीन होतो

या अंजनयोगाने बुद्धीची धारणा वाढते. आत्मसामर्थ्य वाढून कोणत्याही प्रसंगी मनुष्य घाबरून न जाता धैर्याने मार्ग शोधून काढतो. वास्तुदोष जातो. आत्मानुभूतीसाठी प्रतीक्षा करणाऱ्या उपासकाला हा अंजनयोग वरदानच ठरेल

विधि– हा अंजनयोग करणारी व्यक्ति अनुग्रहीत *(गुरूपदेश घेतलेली) असावी. फक्त एकाच अशा व्यक्तीने हा अंजन प्रयोग करावयाचा असतो कोणत्याही रविवारी सुरू करावयाचा व ८ वे दिवशी पूर्ण करावयाचा रोज रात्री ११ ते १ वाजेपर्यंत प्रत्येक दिवशी ३ हजार पुढील मंत्र म्हणावा.

मंत्र – ॐ भूर्भुवः स्वः ॐ तत्सवितुर्वरेण्य ।
भर्गोदेवस्य धीमहि धियो यो नः प्रचोदयात् ॐ ॥

पूर्व दिशेला पश्चिमेकडे तोंड करून चौरंग व पाट मांडून दोन्ही बाजूला समया असाव्यात सप्तधान्ये (तांदूळ, उडीद, मूग, चणे, काळेतीळ, तूर, कुळीथ) प्रत्येकी ५ मुठीप्रमाणे एकत्र करुन चौरंगावर घालावीत. वर ताम्याचा कलश ठेवावा त्यात पाणी घालून लाजाळू, पिंपळ, औदुंबर, जाभुळ, आंबा व दूर्वा ही घालावी गायत्रीची ३अथवा ५ गुंज वजनाची सुवर्णाची, चांदीची अथवा ताम्याची प्रतिमा ताम्हनात तांदूळ घालून त्यावर ती प्रतिमा ठेवावी ते ताम्हन कलशावर ठेवावे चौरंगासमोर जमीन शेणमातीने सारवून आधीच घ्यावी त्यावर स्वस्तिक रेखून घ्यावे नतर निरांजन लावावे. तीन पेले व त्याची काजळासाठी रचना योग परिचयात पहावी नतर *अनुग्रहीत व्यक्तीने प्रतिमेला गंध-फूल वाहून नैवेद्याला पेढे वा केळी ठेवून मग प्रार्थना करावी. मग जप सुरू करावा

अंजनयोगात घ्यावयाची काळजी – अनुग्रहीत व्यक्तीने सोवळ्यात बसावे. जेथे जप चालू असेल ती देवघराची जागा बंदिस्त असावी समजा सध्याच्या काळात अशी सोय नसेल तर जपकर्त्या व्यक्तीच्या घरातील माणसाने जपाचे वेळी एकही शब्द बोलू नये.

दूर शांत बसावे. जप चालू असताना व रात्री घरातील माणसांनी बाहेर जाऊ नये व बाहेरून कोणाला आत घेऊ नये. दरवाजा खिडक्या बंद असाव्यात. आवाज झाल्यावर दरवाजा उघडू नये. इतकेच काय परंतु या आठ दिवसाच्या काळात स्वप्न पडल्यास तारीख, वेळ व स्वप्न टिपून ठेवावे. जप करणाऱ्या माणसाने या काळात कोठेही जाऊ नये

* अनुग्रहीत व्यक्ति नसेल त्यांनी कोणत्याही ब्राह्मणाला किंवा गायत्री जप करणाऱ्या व्यक्तीला नारळ, १। रु. देऊन १२ वेळा गायत्री मंत्र म्हणून घ्यावा व ३ वेळा उजव्या कानात म्हणून घ्यावा म्हणजे अनुग्रह झाला.

परशराम यशवंत वावळे
सदाशिव पेठ, पुणे
ता. १५-६-७३

ती. महालेशा श्री यास,

स. न. वि. वि. अनेक वर्षे मी घरगुती विचारांनी बेचैन झालो होतो. त्यामुळे शरीराला व मनाला मुळीच शांतता नव्हती व स्वास्थ्य लाभत नव्हते. आपली भेट त्र्यंबकेश्वरी झाली. आपणाकडून गायत्री अंजन योगाचे मार्गदर्शन झाले अंजनयोगाने मला पूर्ण मन शांति व शारीरिक स्वास्थ्य मिळाले आपला गायत्री अंजनयोग त्वरित फलदायी झाला. यापुढेही आपणाकडून जास्तीत जास्त लोकांना मार्गदर्शन होऊन संकटनिवारण व्हावे अशी प्रार्थना करीत आहे.

आपला
परशराम यशवंत वावळे

श्री

एन. सी. जोशी
कोल्हापूर
१४-४-१९६३

तीर्थरूप महालेशास्त्री यांस

सप्रेम नमस्कार,

कीर्तनाच्या निमित्ताने अंबाबाईचे मंदिरात आपली भेट झाली आपण अगत्याने माझे घरी आलात. त्या वेळी मी पोष्टात साधा कारकून होतो. बुद्धिमान् असून माझे परिस्थितीमुळे मी हतबल झालो होतो. घरात अठराविश्वे दारिद्रय होते. आपण कोल्हापूरच्या मुक्कामात माझ्याकडून अक्षरशः पाठी लागून गायत्री अंजनयोग करून घेतलात. यामुळे माझी आर्थिक स्थिति सुधारत गेली व आज मी पोस्टमास्तर झालो जे मी स्वप्नात अनुभवले नसते ते या साध्या प्रयोगाने तुम्ही माझ्या जीवनात प्रत्यक्ष घडवून आणलेत. आपला मी कसा ऋणी होऊ हे कळत नाही. आम्हा उभयतांचा नमस्कार, मुलांना आशीर्वाद

आपला
एन. सी. जोशी
पोस्टमास्तर

* * *

सात्रीने श्रीमंत होण्याचा

# लक्ष्मी अंजनयोग

'लक्ष्मी च धनदा नित्या । अजनेन समावृता ।।

(अर्थ-नित्य लक्ष्मी हातात रहावी म्हणून अजनयोगाने तिला वश करावी.)

आपण नोकरी करून, उद्योगातून, शेतीतून व अन्य प्रकारे पैसे कमावतो, परतु प्रपचात येणाऱ्या अनेक अनपेक्षित सकटामुळे पैसे खर्च होतात. इतकेच नव्हे तर प्रसगी जवळची चीजवस्तु गहाण ठेवून अथवा व्याजाने कर्जाऊ पैसे काढून प्रसंगाला तोड द्यावे लागते अशा वेळी आपण कष्ट करून देखील भविष्यकाळासाठी काहीच शिल्लक टाकू शकत नाही जर आपण प्रयत्नाने थोडी फार माया जमवली तर, आपल्या भिडस्त स्वभावामुळे आपल्याकडे पैसे मागावयास येणाऱ्या व्यक्तींच्या प्रसंगाकडे पाहून व त्याच्या शब्दावर विश्वास ठेवून आपण झट्कन त्याला पैसे देतो, व त्यामुळे पुढे ते पैसे मिळालेच तर अनेक दिवसानी मनस्ताप होऊन मिळतात किंवा बुडून जातात असे हे व्यवहारात घडू नये व आपली पैशाची कामे व्हावीत, अचानक धनलाभ व्हावा यासाठी हा अजनयोग उपयोगात आणावा

विधि- कोणत्याही शुभवारी सुरवात करावी पूर्व किंवा उत्तर दिशेला तोड करून लक्ष्मीचा फोटो ठेवावा. त्याच्यापुढे चौरगावर सस्कारित श्री यत्र ठेवावे. दोन समया असाव्यात तुपाचे निराजन काजळासाठी उपयोगात आणावे.

मत्र-शरणागत दीनार्तपरित्राणपरायणे ।
सर्वस्यार्तिहरे देवि नारायणि नमोऽस्तुते ।।

वरील मंत्र रोज ३ हजार व दुर्गाकवच ५ वेळा असे १६ दिवस करावे उपासनेच्या वेळी उत्तम धूप किंवा अगरबत्ती जाळावी केवडा अत्तर देवीला यथावकाश वापरावे. जपाच्या शेवटच्या दिवशी ५ कुमारिका (वय वर्षे ९ पर्यंत) पूजा करून त्यांना जेवण वाढावे देवीवर श्रद्धा ठेवावी काजळ काढून घ्यावे

उपासनेच्या काळात घ्यावयाची काळजी

१ जप रात्री ९ ते ११ करावा. २ सोळा दिवस उपासकाने एकभुक्त रहावे आहारात मीठ, मिरची नसावी फक्त दूध भात घेणे उत्तम आवट पदार्थ वर्ज. ३. जपाची जागा शक्यता बंद असावी ४. जपाला खास स्त्री वा पुरुष यापैकी एकानेच बसावे व जप पूर्ण होईपर्यंत घर सोडून कुठे जाऊ नये ५ जपकाळात रात्रा ९ ते ११, दरवाजा उघडू नये जर दरवाजावर अथवा खिडक्यावर आवाज झाले किंवा कोणी हाक मारली तरी दरवाजा अथवा खिडक्या उघडू नयेत

## दुर्गाकवच

ॐ अस्य श्रीचण्डी कवचस्य ब्रह्मा ऋषि अनुष्टुप छन्द चामुण्डा देवता, अगन्यासोक्तमातरो बीजम् दिग्बन्ध देवतास्तत्वम् श्री जगदम्बाप्रीत्यर्थे सप्तशती पाठाङ्गत्वेन जपे विनियोग ।

ॐ नमश्चण्डिकायै ॥ मार्कण्डेय उवाच । ॐ यद् गुह्य परम लोके सर्वरक्षाकर नृणाम् । यन्नकस्यचिदाख्यात तन्मे ब्रूहि पितामह ॥१॥ ब्रह्मोवाच । अस्ति गुह्यतम विप्र सर्वभूतोपकारकम् । देव्यास्तु कवच पुण्य तच्छृणुष्व महामुने ॥२॥ प्रथम शैलपुत्रीति द्वितीय ब्रह्मचारिणी । तृतीय चन्द्रघण्टेति कूष्माण्डेति चतुर्थकम् ॥३॥ पञ्चम स्कन्दमातेति षष्ठ कात्यायनीति च । सप्तम कालरात्रिश्च महा-

गौरीतिचाष्टमम् ॥४॥ नवम सिद्धिदात्री च नव दुर्गा. प्रकीर्तिताः । उक्तान्येतानि नामानि ब्रह्मणैव महात्मना ॥५॥ अग्निना दह्यमानस्तु शत्रुमध्ये गतो रणे । विषमे दुर्गमे चैव भयार्ता शरण गता ॥६॥ न तेषा जायते किंचिदशुभ रणसकटे । नापद तस्य पश्यामि शोक-दु खभय नहि ॥७॥ यैस्तु भक्त्या स्मृता नून तेषा सिद्धि प्रजायते । ये त्वा स्मरन्ति देवेशि रक्षसे तान्न सशय ॥८॥ प्रेतसस्था तु चामुण्डा वाराहि महिषासना । ऐन्द्री गजसमारूढा वैष्णवी गरुडासना ॥९॥ माहेश्वरी वृषारूढा कौमारी शिखिवाहना । लक्ष्मी पद्मासना देवी पद्महस्ता हरिप्रिया ॥१०॥ श्वेतरूपधरा देवी ईश्वरी वृषवाहनी । ब्राह्मी हस समारूढा सर्वाभरणभूषिता ॥ ११ ॥ इत्येता मातरः सर्वा सर्वयोग समन्विताः नानाभरण शोभाढ्या नानारत्नोप-शोभिता ॥ १२ ॥ दृश्यन्ते रथमारूढा देव्या क्रोधसमाकुला । शख चक्र गदा शक्ति हल च मुसलायुधम् ॥१३॥ खेटक तोमर चैव परसु पाशमेव च ॥ कुन्तायुध त्रिशूल च शार्ङ्गमायुध-मुत्तमम् ॥१४॥ दैत्याना देहनाशाय भक्तानामभयाय च । धार-यन्त्यायुधानीत्थ देवाना च हिताय वै ॥१५॥ नमस्तेस्तु महारौद्रे महाघोर पराक्रमे । महाबले महोत्साहे महाभयविनाशिनि ॥१६॥ त्राहि मा देवि दुष्प्रेक्ष्ये शत्रूणा भयवर्धिनि । प्राच्या रक्षतु मामैन्द्री आग्नेयामग्निदेवता ॥१७॥ दक्षिणेऽवतु वाराहि नैर्ऋत्या खड्ग धारिणी । प्रतीच्या वारुणी रक्षेद्वायव्यामृग वाहिनी ॥१८॥ उदीच्या पातु कौमारी ऐशान्या शूलधारिणी । ऊर्ध्वे ब्रह्माणि मे रक्षेदधस्ता द्वैष्णवीतया ॥१९॥ एव दशदिशोरक्षेच्चामुण्डा शववाहना ॥ जया मे अग्रत पातु विजया पातु पृष्ठत ॥२०॥ अजितावामपार्श्वे तु दक्षिणे चापराजिता । शिखामुद्योतिनी रक्षेदुमामूर्ध्नि व्यवस्थिता ॥२१॥ मालाधरी ललाटे च भ्रुवौ रक्षेद् यशस्विनी । त्रिनेत्रा च भ्रुवोर्मध्ये यमघटा च नासिके ॥२२॥ शखिनी चक्षुषोर्मध्ये श्रोत्रयो-

द्वारवासिनी । कपोलौ कालिका रक्षेत् कर्णमूले तु शाकरी ॥२३॥ नासिकायां सुगन्धा च उत्तरोष्ठे च चर्चिका । अधरे चामृतकला रक्षेत् जिव्हायां च सरस्वती ॥२४॥ दन्तान् रक्षतु कौमारी कण्ठदेशे तु चंडिका । घण्टिका चित्रघण्टा च महामाय च तालुके॥२५॥ कामाक्षी चिबुकं रक्षेद्वाचं मे सर्व मंगला । ग्रीवायां भद्रकाली च पृष्ठवंशे धनुर्धरी ॥ २६ ॥ नीलग्रीवा बहिःकण्ठे नलिकानलकूबरी । स्कन्धयोः खड्गिनी रक्षेद् बाहू मे वज्रधारिणी ॥ २७ ॥ हस्तयोर्दण्डिनी रक्षेदम्बिकाचांगुलीस्तथा । नखाञ्छूलेश्वरी रक्षेत् कुक्षौ रक्षेत्कुलेश्वरी ॥ २८ ॥ स्तनौ रक्षेन्महादेवी मनःशोकविनाशिनी । हृदये ललितादेवी उदरे शूलधारिणी ॥ २९ ॥ नाभिं च कामिनी रक्षेद् गुह्यं गुह्येश्वरी तथा । पूतना कामिका मेढ्रं गुदे महिषवाहिनी ॥ ३० ॥ कट्यां भगवती रक्षेज्जानुनी विन्ध्यवासिनी । जंघे महाबला रक्षेत् सर्वकामप्रदायिनी ॥ ३१ ॥ गुल्फयोर्नारसिंही च पादपृष्ठे तु तैजसी । पादांगुलीषु श्री रक्षेत् पादाधस्थलवासिनी ॥३२॥ नखान्दंष्ट्रा कराली च केशांश्चैवोर्ध्वकेशिनी । रोमकूपेषु कौमारी त्वचं वागीश्वरी तथा ॥ ३३ ॥ रक्तमज्जावसामासान्यस्थिमेदांसि पार्वती । अन्त्राणि कालरात्रिश्च पित्तं च मुकुटेश्वरी ॥ ३४ ॥ पद्मावती पद्मकोषे कफे चूडामणिस्तथा । ज्वालामुखी नखज्वाला अभेद्या सर्वसन्धिषु ॥३५॥ शुक्रं ब्रह्माणि मे रक्षेच्छाया छत्रेश्वरी तथा । अहंकारं मनोबुद्धिं रक्ष मे धर्मधारिणी । ३६ ॥ प्राणापानौ तथा व्यानमुदानं च समानकम् । वज्रहस्ता च मे रक्षेत्प्राणं कल्याणशोभना ॥ ३७ ॥ रसे रूपे च गन्धे च शब्दे स्पर्शे च योगिनी सत्त्वं रजस्तमश्चैव रक्षेन्नारायणी सदा ॥ ३८ ॥ आयु रक्षतु वाराही धर्मं रक्षतु वैष्णवी । यशः कीर्तिं च लक्ष्मीं च धनं विद्यां च चक्रिणी ॥ ३९ ॥ गोत्रमिन्द्राणी मे रक्षेत्पशून्मे रक्ष चण्डिके । पुत्रान् रक्षेन्महालक्ष्मीर्भार्यां रक्षतु भैरवी ॥४०॥ पन्थानं सुपथा रक्षेन्मार्गं क्षेमकरी

तथा ।। राजद्वारे महालक्ष्मीर्विजया सर्वतः स्थिता ।। ४१ ।। रक्षा-हीन तु यत्स्थान वर्जितं कवचेन तु । तत्सर्वं रक्ष मे देवि जयन्ती पापनाशिनी ।। ४२ ।। पदमेक न गच्छेत्तु यदीच्छेच्छुभमात्मनः । कवचेनावृतो नित्य यत्र तत्रैव गच्छति ।। ४३ ।। तत्रतत्रार्थ लाभश्च विजयः सार्वकामिकः । य य चिन्तयते काम त त प्राप्नोति निश्चितम् । परमैश्वर्यमतुलं प्राप्स्यते भूतले पुमान् ।। ४४ ।। निर्भयो जायते मर्त्यः सग्रामेश्वपराजित । त्रैलोक्ये तु भवेत्पूज्य कवचेनावृतः पुमान् ।। ४५ ।। इद तु देव्याः कवच देवानामपिदुर्लभम् । यः पठेत्प्रयतो नित्य त्रिसन्ध्य श्रद्धयान्वित. ।।४६।। दैवी कला भवेत्तस्य त्रैलोक्येष्व पराजित । जीवेद्वर्षशत साग्रमपमृत्युविवर्जितः ।।४७।। नश्यन्ति व्याधय. सर्वे लूता विस्फोटकादयः । स्थावर जगम चैव कृत्रिमं चापियद्विषम् ।। ४८ ।। अभिचाराणि सर्वाणि मंत्रयन्त्राणि भूतले । भूचरा. खेचराश्चैव जलजाश्चोपदेशिकाः ।। ४९ ।। सहजाः कुलजा मालाः डाकिनी शाकिनी तथा । अन्तरिक्षचराघोरा डाकिन्यश्च महावलाः ।। ५० ।। ग्रहभूतपिशाचाश्च यक्षगन्धर्वराक्षसाः । ब्रम्हराक्षसवेतालाः कूष्माण्डा भैरवादय ।। ५१ ।। नश्यन्ति दर्शनात्तस्य कवचे हृदि सस्थिते । मानोन्नतिर्भवेद् राज्ञस्तेजोवृद्धिकरं परम् ।। ५२।। यशसा वर्धते सोऽपि कीर्तिमडित भूतले । जपेत्सप्तशती चडी कृत्वा तु कवच पुरा ।। ५३ ।। यावद् भूमण्डल धत्ते सशैलवनकाननम् । तावत्तिष्ठति मेदिन्या सन्तति पुत्रपौत्रिकी ।। ५४ ।। देहान्ते परमं स्थान यत्सुरैरपि दुर्लभम् । प्राप्नोति पुरुषो नित्य महामायाप्रसादत. ।। ५५ ।। लभते परमं रूप शिवेन सह-मोदते ।। ५६ ।।

।। इति वाराह पुराणे हरिहरब्रह्म विरचित
देव्याः कवच समाप्तम्।।

श्री
ए जी तोडकर B A
दत्तात्रय इलेक्ट्रिकल कार्पोरेशन
माहीम सर्व्हिस इंडस्ट्रियल इस्टेट
मोरीरोड, माहीम पश्चिम, मु १९
ता २३-२-१९७२

गुरुवर्य तावेमहाराज यास,

मी मेहबूब स्टुडियोचा मॅनेजर म्हणून १५ वर्षे नोकरी केली कै मेहबूबनतर मला नोकरी सोडणे भाग पडले यानतर मी अनुभवाने इलेक्ट्रिकलची छोटी मोठी काम घेत होतो व माझी दत्तउपासना असल्यामुळे माझ्या कपनीचे नावही दत्तात्रय इलेक्ट्रिकल कार्पोरेशन ठेवले धदा म्हणून मला फारच कष्ट पडत होते आपण माझ्या ऑफिसमध्ये 'लक्ष्मी अजनयोगाचा प्रयोग केलात व विजेच्या कपातीमुळे आलेला मोठा धोका आपण टाळ लात व माझेच वदना प्लॅस्टिक कार्पोरेशन सुरू होऊन भरभराट होत आहे त्यातच 'कोटा' राजस्थान येथील लाखो रुपयाचे काम मला अडीच वर्षांकरिता मिळाले हा सर्व आपल्या मार्गदर्शनाचा परिणाम होय, अशी माझी व पत्नीची श्रद्धा आहे आपण दर रविवारी माझ्या ऑफिसचा ज्योतिषमार्गदर्शन देण्यासाठी उपयोग करावा त्याची किल्ली मी तयार केली आहे आपण हे आपलेच ऑफिस समजून जनकार्य करावे तीर्थरूप महालेमावांना आमचा नमस्कार

आपला नम्र,
तोडकर ए जी

### वास्तूतील पिशाच्चबाधा जाण्यासाठी

# मारुति अंजनयोग

व्यक्तीच्या अनेक दिवसाच्या एखाद्या वास्तूतील वास्तव्यामुळे त्या वास्तूतील अणुरेणूशी त्याचे व्यक्तिमत्त्व एकरूप झालेले असते. मृत्यूच्यावेळी जर वासना त्या वास्तूवर राहिली तर पुढे त्या वास्तूत पिशाच्चरूपाने ती व्यक्ति वावरत असते.तसेच जर वास्तूच्या खाली जमिनीत खून झालेला माणूस पुरला असेल, तरी देखील अशाच पिशाच्च बाधा होतात. घरात वाईट, भीतिदायक स्वप्ने पडणे, सतत आजार असणे, विवाह न होणे, कुटुंब कर्जबाजारी होणे, दारिद्र्यावस्था प्राप्त होणे, घरात कुणाचेच विचार एकमेकाना न पटणे, लहान सहान कारणावरून भाडणे, मारामाऱ्या होणे, घरात चोऱ्या होऊन नुकसान होणे इ. यासाठी हा अजनयोग उपयोगात आणावा. या अजनाने जपकर्त्याला जपकाळात स्वप्नातून वास्तुदोषाच्या सूचना होतात.

**विधि**—या अंजनयोगाला आठ दिवस लागतात. सुरवात केल्यापासून आठवे दिवशी रविवार यावा पूर्व दिशेला पश्चिमेकडे तोंड करून चौरंग वा पाट मांडून दोन्ही बाजूला समया असाव्यात. सप्त धान्ये प्रत्येकी पाच मुठी प्रमाणे (तांदूळ, उडीद, मूग चणे, काळे तीळ, तूर, व कुळीथ) एकत्र करून चौरंगावर घालावीत. वर ताम्याचा कलश ठेवावा. त्यात पाणी घालून लाजाळू, औदुंबर, जांभूळ, आंबा व दूर्वा ही घालावीत. वरती मारुतीची किमान तीन गुंज वजनाची तांबा, चांदी किंवा सोन्याची प्रतिमा ताम्याच्या ताम्हनात तांदूळ घालून त्यावर ठेवावी. ते ताम्हन कलशावर

ठेवावे. चौरंगासमोर जमीन शेणमातीने सारवून आधीच घ्यावी. त्यावर स्वस्तिक रेखून घ्यावे. नंतर निरांजन लावावे. तीन पेले व त्याची काजळासाठी रचना याराठी योग परिचय प्रकरण वाचावे. नंतर यजमानाने ( स्त्री वा पुरुष कोणीही ) मारुतीला गंध, फूल वाहून नैवेद्याला पेढे या केळी ठेवून मग प्रार्थना करावी. घरातील मंडळींनी कलशाचे समोर बसून रोज रात्री किमान १०८ वेळा मारुतिस्तोत्र (भीमरूपीस्तोत्र) व नंतर पुढील मंत्रजप दोन तास पूर्ण होईपर्यंत करावा.

मंत्र – ॐ ह्रीं वीर हनुमते अंजनीसुताय नम. ॐ ॥

सूचना – मंत्रजप चालू असताना रात्री ९ ते पहाटे ४ वाजेपर्यंत दरवाजा उघडू नये. आठवे दिवशी पाणी घरात शिपडावे. घरात बाधा असल्यास जपाचे वेळी त्या व्यक्तीला मध्ये बसवावे. व आठवे दिवशी कलशांतील पाणी त्या व्यक्तीला स्नानास द्यावे. ११ मुलांना जेवण व फराळ देण्यात यावा. काजळ काढून घ्यावे. हे काजळ बाधा झालेल्या व्यक्तीने रोज डोळयात घालावे. मारुतीची प्रतिमा मुलाचे गळयात बांधावी.

### श्रीमारुतिस्तोत्र

भीमरूपी महारुद्रा, वज्रहनुमान मारुती ।
वनारी अंजनीसुता, रामदूता प्रभंजना ॥ १ ॥
महाबळी प्राणदाता, सकळा उठवी बळे ।
सौख्यकारी दुःखहारी, दूतवैष्णवगायका ॥ २ ॥
दीननाथा हरीरूपा, सुंदरा जगदंतरा ।
पातालदेवताहंता, भव्यसिंदूरलेपना ॥ ३ ॥

लोकनाथा, जगन्नाथा, प्राणनाथा, पुरातना ।
पुण्यवंता पुण्यशीला, पावना परतोषका ॥ ४ ॥
ध्वजांगे उचली बाहो, आवेशे लोटला पुढे ।
कालाग्नि, कालरुद्राग्नि, देखतां कांपती भये ॥ ५ ॥
ब्रह्मांडें माइलीं नेणों, आवळे दंतपंगती ।
नेत्राग्नि चालिल्या ज्वाळा, भ्रुकुटी ताठिल्या बळें ॥ ६ ॥
पुच्छ तें मुरडिलें माथां, किरीटी कुंडलें बरीं ।
सुवर्ण कटिकांसोटि, घंटा किंकिणि नागरा ॥ ७ ॥
ठकारे पर्वताऐसा, नेटका सडपातळू ।
चपळांग पाहतां मोठें, महाविद्युल्लतेपरी ॥ ८ ॥
कोटिच्या कोटि उड्डाणें, झेंपावे उत्तरेकडे ।
मंदाद्रीसारिखा द्रोणू, क्रोधें उत्पाटिला बळें ॥ ९ ॥
आणिला मागुती नेला, आला गेला मनोगति ।
मनासी टाकिलें मागें, गतीसी तुळणा नसे ॥ १० ॥
अणुपासोनि, ब्रह्मांडा येवढा होत जातसे ।
तयासी तुळणा कोठें, मेरु मंदार धाकुटे ॥ ११ ॥
ब्रह्मांडा भोंवते वेढे, वज्रपुच्छें करूं शके ।
तयासी तुळणा कैंची, ब्रह्मांडीं पाहतां नसे ॥ १२ ॥
आरक्त देखिलें डोळां, ग्रासिलें सूर्यमंडळा ।
वाढतां वाढतां वाढे. भेदिलें शून्यमंडळा ॥ १३ ॥
धनधान्य पशुवृद्धि, पुत्रपौत्र समग्रही ।
पावती रूपविद्यादि, स्तोत्रपाठें करूनिया ॥ १४ ॥
भूतप्रेत समंधादि, रोगव्याधी समस्तही ।
नासती तूटती चिंता, आनंदे भीमदर्शनें ॥ १५ ॥

हे धरा पधरा श्लोकी, लाभली शोभली बरी ।
दृढदेहा, नि संदेहो, संख्या चंद्रकलागुणें ॥ १६ ॥
रामदासी अग्रगण्, कपि कुळासि मंडण् ।
रामरूपी अंतरात्मा, दर्शने दोष नासती ॥ १७ ॥

॥ इति श्री रामदासकृत संकटनिरसन मारुतिस्तोत्र संपूर्णम् ॥

श्री डी के महाडीक
२ लक्ष्मी को ऑ हाऊसिंग
सोसायटी स्टेट बँक सोसायटी
इर्ला विलेपार्ले वेस्ट मु
४–३–१९७१

ती महालेबाबा यास

माझ्या घरी नेहमी पत्नी, मी व मुलगी आजारी पडत असू. त्यातच दोन ते तीन वेळा पत्नीचा अकाली गर्भपात झाला मी तावे महाराजाची गाठ घेऊन त्याना माझ्या पत्रिका दाखविल्या त्याच्याबरोबर आपण माझ्या घरी ' मारुती अंजनयोग ' केलात आपले नामजप करणारे भक्त येऊन खरोखर माझे जीवन बदललेत आज मला दुसरी एक मुलगी असून आमचे आजार आता बंद झालेत घरात जे पिशाच्च होते ते या अंजनयोगाने त्रास द्यायचे बंद झाले आहे आपण आमच्यावर लक्ष ठेवावे तावे महाराजांना सप्रेम नमस्कार

आपला कृपाभिलाषी
डी के महाडीक

### संततिदोष निवारण व धनवृद्धि करणारा

# विष्णु अंजनयोग

घरात सर्व आहे, परंतु घडपडणारी चिमुकली पावले नाहीत. मुले होतात, परंतु जगत नाहीत. नशिबातच संतति नाही. औषधी उपाय झाले. आता पुत्रघाकच नशिबी या प्रकारच्या कुंडल्या आम्ही तपासल्यावर कुंडल्यातील संततिदोषनिवारणार्थ या विष्णु अंजनयोगाचा उपयोग होतो असे आढळून आले.

विधि – चौरंगावर १। शेर तांदूळ, तांब्याचा कलश, त्यावर तांब्याचे ताम्हन ठेवावे. त्या तांदुळावर अष्टदळ कुंकू घेऊन काढावे, वर प्राणप्रतिष्ठा केलेली नांग्याची व सोन्याची लक्ष्मीनारायणाची प्रतिमा ठेवावी. बरोबर गरुड हनुमंत मूर्ति असल्यास अति उत्तम. वजन किमान ५ ते १५ गुंज असावे. जपाचे पहिले दिवशी त्याची ब्राह्मणाकडून शुद्धि व प्राणप्रतिष्ठा करवून घेणे. पुष्य वा शततारका नक्षत्रावर हा अंजनयोग सुरू करावा. वार शुक्रवार, बुधवार.अथवा रविवार असावा. चौरंगावर कलशाजवळ १नारळ,१५ पानाचा विडा, ५ सुपाऱ्या, ५ बदाम, ५ खारका ठेवाव्या. काही दक्षिणा ठेवावी. असल्यास मागे भिंतीला टेकून फोटो ठेवावा. चौरंगाचे डावे उजवे बाजूला खाली समया असाव्यात. समोर जमिनीवर स्वस्तिक काढावे तीन उंच पेले वा विटा, त्यावर तांब्याचे ताम्हन, त्यात थोडे पाणी, जमिनीवर स्वस्तिक, वर निरांजन. शक्यतो चांगले तूप व शुद्ध एरंडेल वापरावे समयांना गोडे तेल वापरावे. जप पुष्य नक्षत्रावर सुरू केला तर सात दिवस, शततारका वा श्रवण नक्षत्रावर ९ दिवस करावा. स्नान करून रात्री श्रीमहालक्ष्मी सह विष्णूची पूजा करून विष्णुसहस्र नाम

वा गोपाल सहस्र नाम पोथीला गंध फूल वाहून ज्या कामनेने हा योग करावयाचा असेल त्याचा उच्चार करावा. जसे संतति, सुपत्नी, धनलाभ वगैरे. जपाला पूजा आटोपून रात्री ११ वाजता बसावे व रात्री १ वाजता जप पूर्ण करावा. रोज किमान १२ आवर्तनें विष्णु सहस्र नामाची वा गोपाल सहस्र नामाची होतील व व्हावीत.

**महत्त्वाच्या सूचना** – वाचावयाचा अभ्यास आधी करून घ्यावा व मग अजनयोग सुरू करावा अजनयोगात उपासकाने व घरच्या मंडळींनी आचरण सात्त्विक ठेवावे. देवापुढील समया तेवढे दिवस (९ दिवस) अखंड पेटत ठेवाव्या पारायणाला बसणारा १ किंवा ५ जण असावेत. सर्वांनी स्वच्छ वा स्पष्ट पारायण पाठ वाचावे. अजनयोग सुरू असताना तेवढे दिवस रात्री ११ ते पहाटे ५ पर्यंत बाहेरील दरवाजा उघडू नये. पूर्णतेचे दिवशी सकाळी स्नान करून कलश विसर्जन करावा. पाणी घरात शिंपडावे. संततीसाठी स्त्रीला स्नानास द्यावे. ३ मुली व २ मुलगे (वय ३ ते ५) एक सुवासिनी ब्राह्मण यांना क्षीरान्न जेवावयास घालावे कलशावरील प्रतिमा आपले घरात सदैव ठेवावी. अनेकांचे अनुभव या योगाचे फार चांगले आहेत.

## अथ विष्णुसहस्रनाम

श्रीगणेशायनमः । अथ मंगलम् । शुक्लांबरधरं विष्णुं शशिवर्णं चतुर्भुजं । प्रसन्नवदनं ध्यायेत्सर्वविघ्नोपशांतये ॥ १ ॥ नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् । देवीं सरस्वतीं चैव ततो जय मुदीरयेत् ॥ २ ॥ व्यासं वसिष्ठनप्तारं शक्तेः पौत्रमकल्मषम् । पराशरात्मजं वन्दे शुकतातं तपोनिधिम् ॥ ३॥ व्यासाय विष्णुरूपाय विष्णवे नमो वै । ब्रह्मनिधये वसिष्ठाय नमो नमः ॥ ४ ॥

